**गोसीखुर्द प्रकल्पांतर्गत धरणग्रस्तांच्या विविध उपक्रमांकरीता विशेष बाब म्हणून मंजुरी मिळणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक गोसीखुर्द २००९/१३०१/(४४१/२००९)मोप्र-२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ०२ फेब्रुवारी, २०१०**

**प्रस्तावना**

गोसीखुर्द प्रकल्प हा एक मोठा महत्वाकांक्षी बहुउद्देशीय प्रकल्प आहे. या प्रकल्पाच्या बुडीत क्षेत्रात नागपूर जिल्हयातील ५१ गावे व भंडारा जिल्हयातील ३४ गावे येतात. या प्रकल्पामुळे भंडारा, नागपूर आणि चंद्रपूर जिल्हयातील जमिनीस सिंचनाचा लाभ होणार आहे. या प्रकल्पाची एकूण सिंचनक्षमता २,५०,८०० हेक्टर एवढी आहे. सदर प्रकल्पास केंद्र शासनाने दिनांक २६.२.२००९ रोजी 'राष्ट्रीय प्रकल्प' म्हणून मान्यता प्रदान केलेली आहे. गोसीखुर्द हा महाराष्ट्रातील एकमेव राष्ट्रीय प्रकल्प आहे. प्रकल्पाच्या नियोजनानुसार यावर्षी धरणात पाणी साठविणे आवश्यक आहे व सन २०१२ पर्यंत धरणात टप्प्याटप्प्याने पूर्ण जलसंचय पातळीपर्यंत पाणी साठा करावयाचा आहे.

प्रकल्पग्रस्तांच्या प्रमुख मागण्यांमध्ये रोजगाराच्या संधी उपलब्ध होण्याचे दृष्टीने तांत्रिक प्रशिक्षण, व्यापार संकुलांचे बांधकाम, शेतीचे निवाडा व प्रत्यक्ष मोबदला वाटप दिनांकापर्यंतचे कालावधीचे व्याज मिळणे आणि शेती व जमीन धरणात गेल्याने दारिद्रय रेषेखालील कुटुंबाप्रमाणे मिळणारी घरकुलाची सवलत उर्वरित कुटुंबांना मिळावी याचा समावेश आहे. यानुसार प्रकल्पग्रस्तांना पर्यायी गावठाणात स्थलांतरीत होण्यास प्रवृत्त करण्यासाठी काही अतिरिक्त सुविधा दिल्यास स्थलांतरण प्रक्रियेस गती प्राप्त होईल व विहित कालावधीत पुनर्वसनाची प्रक्रिया पूर्ण करण्यास मदत होईल.

त्यामुळे बाधित कुटुंबियांच्या उपरोक्त मागण्यांबाबत सहानुभूतीपूर्वक विचार करुन गोसीखुर्द या राष्ट्रीय प्रकल्पांतर्गत धरणग्रस्तांच्या विविध उपक्रमांकरिता विशेष बाब म्हणून मंजूरी देणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

धरणग्रस्तांच्या मागण्यांबाबत सर्वांगिण विचार करुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**१) गोसीखुर्द प्रकल्पाचे बाधितांना बाधित शेतीचा निवाडा घोषित झाल्यानंतर प्रत्यक्षात वाटपाच्या दिनांकापर्यंतच्या कालावधीकरिता व्याज देण्याबाबत.**

गोसीखुर्द प्रकल्पाचे प्रकल्पबाधितांना त्यांचे बाधित शेतीचा मोबदला काही प्रकरणी निवाडा घोषीत होऊन काही कालावधी गेल्यानंतर प्रत्यक्ष वाटप झाला आहे. त्यानुसार उशीरा मोबदला वाटप झालेल्या प्रकरणी नागपूर जिल्हयाकरिता रु.४२७५.२९ लक्ष व भंडारा जिल्हयाकरिता रु.२८५४.०९ लक्ष असा एकूण रु.७१२९.३८ लक्ष खर्चास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदरच्या रक्कमेचे धरणग्रस्तांना जिल्हाधिकाऱ्यांकडून वाटप केले जाईल.

**२) गोसीखुर्द प्रकल्पाचे बाधित क्षेत्रातील प्रकल्पग्रस्तांकरिता पर्यायी गावठाणात व्यापार संकुल बांधण्याबाबत.**

बाधित गावातील कुटुंबांचे नविन पर्यायी गावठाणात स्थलांतरण झाल्यानंतर तेथे स्थलांतरीत कुटुंबांना रोजगाराची संधी उपलब्ध होण्याचे दृष्टीने कुटुंब संख्या लक्षात घेता त्यानुसार सरासरी २५ कुटुंबामागे १ दुकान याप्रमाणे दुकानांची संख्या घेण्यात आली आहे. (दुकानाचा आकार १० X १२ फूट) प्रत्येक दुकानाचे बांधकामाकरिता सरासरी एक लक्ष रुपये याप्रमाणे नागपूर जिल्हयातील बाधित क्षेत्रातील ५१ गावांकरिता व्यापार संकुलाकरिता (३५० दुकानांकरिता) रुपये ३५०.०० लक्ष, तसेच भंडारा जिल्हयातील ३४ बाधित गावांकरिता व्यापार संकुलाकरिता (२५२ दुकानाकरिता) रुपये २५२.०० लक्ष खर्च अशा दोन्ही जिल्हयातील बाधित गावांकरिता एकूण रुपये ६०२.०० लक्ष खर्चास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर व्यापारी संकुल बांधण्याचे प्रत्यक्ष काम हाती घेताना स्थानिक गरजेनुसार दुकानाची संख्या ठरविण्यात यावी. ग्रामविकास विभागामार्फत व्यापारी संकुलाचे बांधकाम करण्याची योजना आहे व त्या योजनेच्या निकषाप्रमाणे प्रस्तावित ठिकाणी संकुलाचे बांधकाम व त्याचे वाटप करण्यात यावे.

**३) गोसीखुर्द प्रकल्पाचे बाधित क्षेत्रातील प्रकल्पग्रस्त कुटुंबांना रोजगार उपलब्ध होण्याबाबत.**

पर्यायी गावठाणात स्थलांतरीत झाल्यावर येथे रोजगार उपलब्ध होण्याचे दृष्टीने सहा महिन्यांचे रोजगाराभिमुख तांत्रिक प्रशिक्षण देण्याबाबतच्या धरणग्रस्तांच्या मागणीनुसार नागपूर जिल्हयातील प्रकल्पग्रस्त ८३२५ कुटुंबातील एका व्यक्तीस (जास्तीत जास्त रु.१००००/- प्रती प्रशिक्षण प्रती प्रशिक्षणार्थी) रुपये ८३२.५० लक्ष व भंडारा जिल्हयातील प्रकल्पग्रस्त ६२९८ कुटुंबातील एका व्यक्तीस (जास्तीत जास्त रु.१००००/- प्रती प्रशिक्षण प्रती प्रशिक्षणार्थी ) रुपये ६२९.८० लक्ष अशा एकूण रुपये १४६२.३० लक्ष खर्चास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**४) गोसीखुर्द प्रकल्पाचे बाधित गावातील कुटुंबांना इंदिरा आवास योजनेअंतर्गत घरकुलाचा लाभ मिळण्याबाबत**

गोसीखुर्द प्रकल्पाचे बाधित क्षेत्रातील प्रकल्पग्रस्तांना दारिद्रय रेषेखालील कुटुंबांना विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे मंजूर ठरावानुसार इंदिरा आवास योजनेअंतर्गत घरकुल अंतर्गत बांधकामासाठी रु.२८५००/- प्रति घरकुल प्रमाणे मंजूरी देण्यात आली होती. त्याचा लाभ नागपूर जिल्हयातील २९०१ कुटुंबांना व भंडारा जिल्हयातील २९३६ कुटुंबांना मिळणार आहे. आता बांधकाम साहित्य व इतर बाबींचे किंमतीत वाढ झाल्याने शासनाने प्रति घरकुल रुपये ६८५००/- एवढी सुधारीत रक्कम घरकुल योजनेसाठी निश्चित केलेली आहे. उर्वरित कुटुंबाची शेती/घरे संपादन झाल्यामुळे सदर कुटुंब भूमीहीन झाल्याने घरकुल बांधून देण्याबाबत प्रकल्पबाधितांच्या मागणीनुसार उर्वरित कुटुंबांनाही घरकुल योजनेअंतर्गत लाभ देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

त्यानुसार नागपूर जिल्हयातील उर्वरित ५४२४ कुटुंबांना इंदिरा आवास योजनेंतर्गत रुपये ६८५००/- प्रमाणे रुपये ३७१५.४४ लक्ष तर भंडारा जिल्हयातील उर्वरित ३३६२ कुटुंबांना इंदिरा आवास योजनेंतर्गत रुपये ६८५००/- प्रमाणे रुपये २३०२.९७ लक्ष अशा एकूण रुपये ६०१८.41 लक्ष इतक्या खर्चास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. इंदिरा आवास योजनेअंतर्गतची सदर बांधकामे, संबंधित योजनेच्या कॉस्ट नॉर्मस/कार्यपध्दतीप्रमाणे बांधण्यात यावीत.

गोसीखुर्द हा राष्ट्रीय प्रकल्प असल्याने केंद्र शासनाने मान्य केलेल्या सिंचन निर्मितीचा कालबध्द कार्यक्रम यशस्वीपणे राबविण्याकरिता वरील प्रस्ताव मान्य केलेले आहेत. गोसीखुर्द प्रकल्पासाठी विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास राज्य शासनाकडुन उपलब्ध झालेल्या अनुदानातून सदरचा खर्च भागविण्यात यावा. सदरच्या रकमेचे लाभधारकांना करावयाचे भुगतान जिल्हाधिकाऱ्यांमार्फत होईल. विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाने हा निधी जिल्हाधिकाऱ्यांकडे त्यांच्या मागणीनूसार सुपूर्द करावा.

सदर प्रस्तावांना विशेष बाब म्हणून मान्यता मिळालेली असल्याने ही बाब पूर्व उदाहरण म्हणून इतर प्रकल्पावर वापरता येणार नाही.

प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २५/व्यय-१२, दिनांक २५/१/२०१० अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर (**www.maharashtra.gov.in**) उपलब्ध करण्यात येत असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००२०२१७४०३९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(मु. कि. वैरागडे)**
**शासनाचे उप सचिव**

प्रति,

खाजगी सचिव, मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा.मंत्री (नियोजन व वित्त), मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा.मंत्री (महसूल), मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा.मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.अ.मु.स.(मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.सचिव(जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर
जिल्हाधिकारी, नागपूर
जिल्हाधिकारी, भंडारा
अधीक्षक अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प मंडळ, नागपूर
मोप्र-२ कार्यासन संग्रहार्थ